**मौजे डाऊळ , ता.उदगीर, जि. लातूर येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो-२०१४ /प्र.क्र.१३०/पापु १८**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीख: २१ मार्च , २०१७**

वाचा -

१) ग्रामपंचायत डाऊळ,ता.उदगीर, जि. लातूर, यांचा ग्रामसभा ठराव क्र २५, दिनांक २२/०८/२०१०.
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर यांची तांत्रिक मान्यता क्र.२०११/जिपला/ग्रापापुवि/कार्या-०६/सीआर-४१७/ता.मा, दि. १६/०६/२०११
३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर यांची तांत्रिक मान्यता क्र.जिपला/लपावि/कार्या-०६/ता.मा. २/०१, दि. २३/२/२०१६.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे क्र.जिपला/लपावि/कार्या-६/ एसआय९३/२००७, दिनांक १३/०२/२०१७.

**प्रस्तावना**

मौजे डाऊळ ( ता.उदगीर, जि. लातूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.५१,९८,,०३९/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्राम सभा ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातुर यांनी संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये सदर योजनेच्या रु.५१,९८,०३९(ढोबळ) किंमतीस तांत्रिक मान्यता दिली होती. तथापी सदर योजनेच्या कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे खर्चात वाढ झाली असल्याने कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर यांनी सदर योजनेच्या रु.५९,७१,६६१/- (ढोबळ) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास संदर्भ क्र.३ अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. यास्तव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातुर यांनी सदर योजनेच्या सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.४ अन्वये शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे डाऊळ (ता.उदगीर,जि.लातूर) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.५९,७१,६६१/- (ढोबळ) (अक्षरी रुपये एकोणसाठ लक्ष एक्काहत्तर हजार सहाशे एकसष्ठ फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता आदेशामध्ये नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व योजनेचे कंत्रादार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ७,७३,६२२/- (अक्षरी रुपये सात लक्ष त्र्याहत्तर हजार सहाशे बावीस फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. सदर आदेश ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११३५८२८३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.03.21 15:29:39 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, लातूर.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.

११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, लातूर
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१३) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, लातूर.
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, लातूर.
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, लातूर.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,१०,१३,१७,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.